साधन संपत्ती निर्धारण व आधार सामग्री विकास घटक या योजनेत्तर योजनेखालील २ अस्थायी पदे सन २०२२-२३ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एफडीएम २०२२/प्र.क्र.२०/फ-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २३ मार्च, २०२२

**वाचावे :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२१/प्र.क्र.२५/फ-२ दि. ३०/०९/२०२१

३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.१८ (२१-२२)/२५६, दि.०९/०२/२०२२

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२२/०२/२०२२

**शासन निर्णय :-**

साधन संपत्ती निर्धारण व आधार सामग्री विकास या योजनेत्तर योजनेतंर्गत २ अस्थायी पदांना वरील दि. ३०/०९/२०२१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२१ ते २८.०२.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात आली होती. सदर पदांची मुदत दि.२८.०२.२०२२ रोजी संपुष्टात आली आहे. त्या अनुषंगाने उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी संदर्भ क्र.३ येथील दि.०९/०२/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सन २०२२-२३ मध्ये सदर २ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

त्याअनुषंगाने खालील विवरणपत्रात दर्शविलेली २ अस्थायी पदे वन विभागाच्या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने या २ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णय दि.२२.०२.२०२२ च्या अधिन राहून दि.०१.०३.२०२२ ते ३१.०८.२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **पदनाम** | **पदसंख्या** |
|---|---|
| अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (नियोजन व व्यवस्थापन-वन्यजीव) | १ |
| विभागीय वनअधिकारी (डाटाबेस) | १ |
| **एकूण** | **२** |

२. या पदांवर होणार खर्च होणारा खर्च “प्रधान शीर्ष -२४०६-वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) ०१ वनीकरण १०१ वनसंधारण विकास व पुनर्निर्मिती (०४) (०१) कार्य आयोजनेची सुधारणा व तयारी (२४०६ ०१४९)” या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२२-२३ या वर्षी त्याखालील मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.८ /१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२३११०८००३३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2022.03.23 11:09:22 +05'30'

**( सुनिल पांढरे )**

उप सचिव (वने)

महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)

४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर

७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ मंत्रालय, मुंबई

८) नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई

९) वन विभागातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.